आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२३-२४ अंतर्गत आदिवासी विद्यार्थ्यांना परदेशातील उच्च शिक्षणाकरीता शैक्षणिक शिष्यवृत्ती योजनेअंतर्गत निधी वितरण....
लेखाशिर्ष (२२२५ ४०९८)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
शासन निर्णय क्रमांक : बीयुडी-२०२३/ प्र. क्र.०२/कार्यासन-०६
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १८ मे, २०२३.

**वाचा :-**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२३ /प्र.क्र.४०/ अर्थ-३, दि. १२.०४.२०२३
२) आदिवासी विकास विभागाची नस्ती क्र. पशिशि-१६२२ /प्र.क्र.६९/कार्या-१२.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत आदिवासी विद्यार्थ्यांना परदेशातील उच्च शिक्षणाकरीता शैक्षणिक शिष्यवृत्ती या योजनेंतर्गत (कार्यक्रम) सन २०२३-२४ मधील अर्थसंकल्पीय तरतुदींतून उपलब्ध रु.२००.०० लाख इतका निधी वितरीत करण्याबाबत संदर्भाधीन क्र.२ अन्वये प्राप्त प्रस्तावास अनुसरुन मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र.टी-५ मधील मुख्य लेखाशीर्ष, २५२५ - अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण या मुख्य लेखाशीर्षाखाली आदिवासी विद्यार्थ्यांना परदेशातील उच्च शिक्षणाकरीता शैक्षणिक शिष्यवृत्ती (कार्यक्रम) या योजनेकरीता वित्त विभागाने सन २०२३-२४ या वर्षातील तरतुदींतून उपलब्ध करुन दिलेल्या मर्यादेतील निधी **रु.२००.०० लाख (अक्षरी रुपये दोन कोटी फक्त)** इतका निधी नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत व खर्च करण्यास खालीलप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे :-

(रु.लाखात)

| योजनेचे नाव | लेखाशिर्ष | बाब | सन २०२३-२४ मधील अर्थसंकल्पीय तरतूद | सदर शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ६ |
| आदिवासी विद्यार्थ्यांना परदेशातील उच्च शिक्षणाकरीता शैक्षणिक शिष्यवृत्ती(कार्यक्रम) | २२२५ ४०९८ | ३४, शिष्यवृत्ती/ विद्यावेतने | १०००.०० | २००.०० |
| **एकूण** | | | **१०००.००** | **२००.००** |

३. सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१२.०४.२०२३ च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय कार्यालयाची राहील.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाने दि.१२.०४.२०२३ रोजीच्या परिपत्रकान्वये अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेल्या निधी मर्यादेत तसेच प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०५१५१६४१३६४५२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

RAJENDRA
DEVARAM
BHAWARI

Digitally signed by RAJENDRA DEVARAM BHAWARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e2f5429d49742f96b79e4293421ba2dfa8a71cad3864b9b289879d173b67fcdc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F617DED8E7182679ED107E63511160B2054D23D8173AD985E5B569A5802CEA5A, cn=RAJENDRA DEVARAM BHAWARI
Date: 2023.05.18 13:16:12 +05'30'

**(राजेंद्र दे.भवारी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री,आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव,मंत्रालय मुंबई.
२. अप्पर मुख्य सचिव, आदिवासी विकास विभाग यांचे स्वीय सहायक,मंत्रालय मुंबई.
३. अप्पर मुख्य सचिव,नियोजन/वित्त विभाग,मंत्रालय मुंबई.
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/नागपूर/अमरावती
६. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
७. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,
८. ग्रंथपाल, महाराष्ट्र राज्य विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
९. वित्त विभाग (अर्थसंकल्प-१९/अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई.
१०. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
११. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१२. सर्व उप सचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. कक्ष अधिकारी (का-१२), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.